**राज्यातील नगरपालिकांना**
**दिनांक १ एप्रिल, २००४ पासून पुढे जकात**
**कर नुकसान भरपाई अनुदान देणेबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :** जीईएन-१२०४/प्र.क्र.२४/२००४/नवि-१४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : २१ मे, २००४.

**वाचा : १)** शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-१०९९/९२७/ प्र.क्र.८८/९९/नवि-१४, दिनांक २६ एप्रिल, १९९९.
**२)** शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०९९/९२७/प्र.क्र.८८/९९/ नवि-१४ (भाग-३), दिनांक १० फेब्रुवारी, २०००.

**प्रस्तावना :**

राज्यातील नगरपरिषदांमधील जकात कराची वसुली दिनांक १ मे, १९९९ पासून पूर्णपणे बंद करावी व १९९८-९९ मधील जकात कराच्या उत्पन्नाच्या आधारे राज्यातील नगरपरिषदांना नुकसान भरपाई अनुदान द्यावे व पहिल्या वर्षानंतरच्या १०% वाढीव दराने हे भरपाई अनुदान द्यावे. ५ वर्षानंतर नगरपरिषदांना हे अनुदान देणे बंद करावे असे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये कळविले होते. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील संबंधीत कलमांना आवश्यक त्या सुधारणा करण्यात आल्या आहेत. त्यानुसार दरवर्षी अर्थसंकल्पात "३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा नगरपरिषदेतील जकात कराची वसुली रद्द केल्यामुळे द्यावयाचे सहाय्यक अनुदान (३६०४०५२१)" यामध्ये तरतूद करुन त्यातून नगरपरिषदांना हे अनुदान देण्यात येते.

जकात कर हा नगरपरिषदेच्या उत्पन्नाचे प्रमुख असे लवचिक उत्पन्नाचे साधन होते. हा कर रद्द केल्यामुळे देय अनुदानातून नगरपरिषदा दैनंदिन प्रशासनिक खर्च भागवितात, त्यामुळे ह्या अनुदानाचे महत्व अनन्यसाधारण आहे. जकात कर नुकसान भरपाई अनुदान यापुढे सुरु ठेवणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील नगरपरिषदांना दिनांक १ मे, १९९९ पासून जकात बंद केल्यामुळे नुकसान भरपाईपोटी देण्यात येत असलेल्या अनुदानाला ५ वर्ष पूर्ण होत आहेत. यासंदर्भात राज्यातील सर्व नगरपरिषदांना जकातीला पर्याय उत्पन्नाची सोय होईपर्यन्त यापुढेही पूर्वीप्रमाणेच

**(कृ. मा. प. ......**

दरवर्षी १०% वाढ याप्रमाणे जकात कर नुकसान भरपाई अनुदान देण्यात येईल, त्यानुसार दरवर्षी याबाबत अर्थसंकल्पात "३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व

अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा नगरपरिषदेतील जकात कराची वसुली रद्द केल्यामुळे द्यावयाचे सहाय्यक अनुदान (३६०४०५२१)" यामध्ये तरतूद करुन त्यातून नगरपरिषदांना हे अनुदान देण्यात येईल.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**[ र. ग. पवार ]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन, सर्व नगरपालिका
सर्व जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
महालेखाकार, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे
मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद
अध्यक्ष, सर्व नगरपरिषद
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
सर्व उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, सर्व महसूली विभाग
सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
निवडनस्ती (नवि-१४)
विषय नस्ती (नवि-१४).

**राज्यातील नगरपालिकांमध्ये जकात कराची**
**ासूली दिनांक १ मे, १९९९ पासून बंद**
**केल्यामुळे द्यावयाच्या नुकसान भरपाई**
**अनुदानाच्या वितरणाबाबत ...........**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :** जीईएन-१००४/२०७/प्र.क्र.३६/२००४/नवि-१४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : २४ मे, २००४.

**वाचा : १)** शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.वानियो-१०२००४/ ३३९/प्र.क्र.१९/२००४/नवि-४, दिनांक ३१ मार्च, २००४.

**प्रस्तावना :**

राज्यातील नगरपरिषदांमधील जकात कराची वसुली दिनांक १ मे, १९९९ पासून पूर्णपणे बंद करण्याचा राज्य शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील कलमांना आवश्यक सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. दिनांक १ मे, १९९९ पासून जकात कराची वसूली बंद केल्यामुळे नगरपरिषदांच्या उत्पन्नात संभावित असलेली तूट व त्यापोटी नगरपरिषदांच्या प्रशासनांवर विपरीत परिणाम होऊ नये म्हणून या नुकसान भरपाईपोटी सन १९९८-९९ या आर्थिक वर्षातील जकात करापोटी नगरपरिषदांनी गोळा केलेल्या प्रत्यक्ष कराची रक्कम आधारभूत धरुन विशिष्ट दराने मासिक हप्त्यामध्ये सहायक अनुदान वितरीत करण्याचा निर्णय घेऊन आतापर्यन्त ते राज्यातील नगरपरिषदांना/ नगरपंचायतींना वितरीत करण्यात आले आहे. सन २००४-२००५ या वर्षातील पहिल्या चार महिन्यासाठी राज्यातील अनुज्ञेय नागरी संस्थांना मासिक हप्त्यापोटी भरपाई अनुदान द्यावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २००४-२००५ वर्षाच्या पहिल्या चार महिन्यासाठी मासिक हप्त्यापोटी तसेच राज्यातील नगरपरिषदा/ नगरपंचायती व अनुज्ञेय महानगरपालिकांना जकात कर नुकसान भरपाई अनुदानाचे वाटप करणेसाठी एकूण रु.१५२,२७,६६,०००/- (अक्षरी रुपये एकशे बावन्न कोटी सत्तावीस लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतका निधी मुक्त करुन तो वितरीत करण्यासाठी शासन याद्वारे मान्यता देत आहे. सदरचा निधी वितरणासाठी संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचे अधिनस्त या आदेशाद्वारे ठेवण्यात येत आहे.

**०२.** संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी "नियंत्रक अधिकारी" या नात्याने या आदेशाच्या अनुषंगाने दर महिन्यासाठी प्रत्येक जिल्ह्यास चालू वित्तीय वर्षात पहिल्या चार महिन्यासाठी अनुज्ञेय रकमेची परिगणना करावी व तेवढी संपूर्ण रक्कम सर्व संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी. संबंधीत सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांचे जिल्ह्यातील सर्व नगरपरिषदांना या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २००४ पासून प्रत्येक महिन्याच्या "पहिल्या आठवड्यात" ही रक्कम जिल्हा कोषागारामार्फत वितरीत करावी. ही रक्कम वितरीत करणेपूर्वी आता यापुढे वित्त विभागाच्या वेगळ्या अनुमतीची आवश्यकता नाही.

ज्या नगरपालिकांचे महानगरपालिकेत रुपांतर झाले आहे व त्यांनी जकात कर वसूली सुरु केली आहे, त्या नवनिर्मित महानगरपालिकांना अनुज्ञेय कालावधीनंतर जकात कर अनुदान दिले जाणार नाही याची संचालनालयाने दक्षता घ्यावी.

**०३.** सदरचे वितरीत करण्यात आलेले अनुदान हे जकात कराची वसूली रद्द केल्यामुळे भरपाईपोटी देण्यात आलेले अनुदान असल्याने, या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र सादर करण्याची आवश्यक असणार नाही. तथापि, या अनुदानामधून संबंधीत नगरपरिषदांनी आपला दैनिक प्रशासनिक खर्च यामध्ये आस्थापनेवरील खर्च तसेच शासकीय देणी ही प्राथम्याने अदा करावयाची आहेत.

**०४.** या अनुदानाच्या विनियोगाबाबतच्या वरील नमूद सूचना तसेच वेळोवेळी निर्गमित केल्या जाणाऱ्या अन्य अनुषंगिक सूचना त्यांनी तंतोततपणे अंमलबजावणी होईल हे पाहण्याची जबाबदारी संबंधीत नगरपरिषदा व नगरपंचायती मुख्याधिकाऱ्यांची व महानगरपालिका संदर्भात संबंधीत महानगरपालिका उपायुक्तांची राहील. तसेच या सर्व बाबींची अंमलबजावणी योग्यतऱ्हेने होते किंवा नाही याचे पर्यवेक्षण संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन करावे.

**०५.** या अनुदानाच्या वितरणाबाबतचा खर्च मागणी क्र.एफ-४, प्रधान शीर्ष ३६०४, स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००-इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा (००) (०८) नगरपालिका क्षेत्रामधील जकात कराची वसूली रद्द केल्यामुळे द्यावयाचे सहायक अनुदान (३६०४०५२१) या लेखाशिर्षाअंतर्गत चालू वित्तीय वर्षाच्या लेखा अनुदानाद्वारे मंजूर तरतूदीखाली खर्ची घालण्यात यावा.

**०६.** सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३२४/व्यय-३, दिनांक ५/५/२००४ च्या अनौपचारिक संदर्भान्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**[ र. ग. पवार ]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन,
कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
सर्व जिल्हाधिकारी, (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
महालेखाकार, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व मुख्याधिकारी/अध्यक्ष, सर्व नगरपरिषद
उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा,
कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

कक्ष अधिकारी (व्यय-३), अर्थसंकल्प-३/१५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी, नवि-४, नवि-१७, नवि-१८,नवि-१९,
नवि-२४, नवि-२६ , नगर विकास विभाग
लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग
प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
निवडनस्ती (नवि-१४).

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एमसीओ-१२९५/३३०८/प्र.क्र.१३८/९५/नवि-१४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : १० मे, २००४**

**प्रस्तावनाः**

राज्यातील नगरपरिषदांमधील मुख्याधिकाऱ्यांचा संवर्ग सन १९७४ पासून तयार करण्यात आला. राज्यातील नागरीकरणाचा वाढीव वेग, पर्यायाने निर्माण होणाऱ्या नागरी समस्या लक्षात घेता संवर्ग मुख्याधिका-यांना नागरी संस्थांमध्ये नियुक्तीची मागणी सर्व स्तरावरुन होते. संवर्ग मुख्याधिका-यांना नागरी प्रशासनाचे इत्यंभूत माहिती असते. ७४ व्या घटना दुरुस्तीनंतर संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्यांमध्ये झालेली वाढ लक्षात घेऊन नागरी प्रशासन अधिक कार्यक्षम, सतर्क व्हावे, नागरिकांना अधिक चांगल्या नागरी सुविधा मिळाव्यात, तसेच संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या सेवेतील कुंठितता घालविण्याच्या दृष्टीने संवर्ग मुख्याधिकाऱ्यांना श्रेणीवाढ देण्याची व महानगरपालिकेत नियुक्ती देणेबाबत धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः**

**अ)** संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-३ (गट-क) रु.५५००-१७५-९००० या वेतनश्रेणीतील सर्व पदे रद्द करण्यात येत आहेत. या वेतनश्रेणीतील सर्व (४०) पदांचा दर्जा वाढवून ही पदे आता राजपत्रित श्रेणी-२ (गट-ब) मध्ये रुपांतरित करुन श्रेणीवाढ देण्यात येत आहे. दर्जा वाढीमुळे या पदाची सुधारित वेतनश्रेणी रु.६५००-२००-१०५०० अशी राहिल.

**ब)** संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-२ (गट-ब) वेतनश्रेणी रु.६५००-२००-१०५०० च्या २१२ पदांपैकी १३६ पदांचा दर्जा वाढवून आता ही पदे श्रेणी-१ (गट-अ) मध्ये रुपांतरित करुन श्रेणीवाढ देण्यात येत आहे. दर्जा वाढीमुळे या पदाची वेतनश्रेणी रु.८०००-२७५-१३५०० अशी राहिल. ही पदे सध्या अस्तित्वात असलेल्या श्रेणी-१ (गट-अ) च्या १८ पदाव्यतिरिक्त असतील. महानगरपालिकेतील जागा यासुध्दा या पदाव्यतिरिक्त असतील.

**क)** संवर्ग मुख्याधिकारी श्रेणी-१ (गट-अ) च्या सेवाजेष्ठ मुख्याधिकाऱ्यांना राज्यातील महानगरपालिकामध्ये नियुक्ती देण्यात येईल. त्याचा संपूर्ण खर्चाचा बोजा महानगरपालिकेवर राहील. त्यामुळे पदसंख्येत वाढ होईल.

**ड)** निवडश्रेणी गटातील संवर्ग मुख्याधिकाऱ्यांची जी पदे महानगरपालिकामध्ये पाठविण्यात येतील त्या पदांवरील संपूर्ण खर्च संबंधीत महानगरपालिकेकडून केला जात असल्यामुळे तेवढीच संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या पद संख्येमध्ये वाढ होईल.

पूर्वपृष्ठावर नमूद सुधारित वेतनश्रेणी दिनांक १/१/१९९६ पासून लागू करण्यात येत असून संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी त्यानुसार

वेतननिश्चिती करावयाची आहे. सुधारित वेतनश्रेणीनुसार वेतननिश्चिती करुन देय वेतन दिनांक १/३/२००४ पासून देय राहील. संवर्ग मुख्याधिकाऱ्यांना श्रेणीवाढ केल्यामुळे सुधारित पदसंख्या व त्यांची वेतनश्रेणी खालीलप्रमाणे राहील :-

| संवर्ग | पदे | वेतनश्रेणी |
|---|---|---|
| मुख्याधिकारी (गट-ब) | ११६ | रु.६५००-२००-१०५०० |
| मुख्याधिकारी (गट-अ) | १५४ | रु.८०००-२७५-१३५०० |
| निवडश्रेणी मुख्याधिकारी (गट-अ च्या २०%) | ३१ | रु.१०६५०-३२५-१५८०० |

महानगरपालिकेतील जागा या पदाव्यतिरिक्त असतील. लोकसंख्येतील वाढीमुळे राज्यातील नागरी संस्थांच्या संरचनेमध्ये जे संभाव्य बदल होतील. त्यानुसार वर्ग अ, ब, क, नगरपरिषदांच्या व महानगरपालिकांच्या संख्येनुरुप मुख्याधिका-यांच्या पदसंख्येत बदल होतील.

संवर्ग मुख्याधिकारी (गट-अ) श्रेणीच्या सेवेतील कुंठितता घालविण्यासाठी सर्व महानगरपालिकेत मंजूर असलेल्या **"उपायुक्त"** व समकक्ष पदाच्या ५०% पदावर नियुक्तीची तसेच निवडश्रेणी मुख्याधिका-यांना नवनिर्मित महानगरपालिकेत **"आयुक्त"** व सध्या अस्तित्वात असलेल्या महानगरपालिकेमध्ये ५ लक्ष वा त्यावरील लोकसंख्या असलेल्या महानगरपालिकेत मंजूर **"अतिरिक्त आयुक्त"** पदावर तसेच ज्या महानगरपालिकेत पद नसेल तेथे अतिरिक्त आयुक्त पद निर्माण करण्याचे निर्देश महानगरपालिकांना देऊन अतिरिक्त आयुक्त पदावर नियुक्त्या देण्यात येईल.

संवर्ग मुख्याधिकाऱ्यांच्या श्रेणीवाढीमुळे (गट-ब) तसेच (गट-अ) मध्ये समाविष्ट झालेल्या मुख्याधिकाऱ्यांची सुधारित सेवाजेष्ठता यादी प्रसिध्द करण्याचा प्रस्ताव संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी हे आदेश निर्गमित झाल्यापासून एक महिन्यात शासनास सादर करावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२३५/२००४/सेवा-९, दिनांक २७/४/२००४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.**

**( र. ग. पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५

आयुक्त, महानगरपालिका (सर्व)

विभागीय आयुक्त, सर्व महसूल विभाग

जिल्हाधिकारी (सर्व)

मुख्याधिकारी, नगरपालिका (सर्व)

नगराध्यक्ष, नगरपालिका (सर्व)

महालेखाकार, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे

संचालक, नगररचना, पुणे

मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई

उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, सर्व महसूली विभाग

प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी

(सर्व कार्यासने) नगर विकास विभागातील सर्व अधिकारी

निवडनस्ती (नवि-१४)

विषय नस्ती (नवि-१४).